पोलीस स्टेशन आवारात महिला
समुपदेशन केंद्रे स्थापन करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-समुप-२०१३/प्र.क्र.५ (भाग-२)/ का-१०**
**नविन प्रशासन भवन, तिसरा मजला,**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई-४०००३२.**
**तारीख- १७ ऑक्टोबर, २०१४.**

**वाचा :-**

१) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२००१/प्र.क्र.६८/का-२, दिनांक १६ ऑगस्ट, २००१.
२) महिला व बाल विकास विभाग, शासन शुध्दीपत्रक क्र.संकीर्ण-२००१/प्र.क्र.६८/का-२, दिनांक १६ ऑगस्ट, २००३.
३) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२००४/प्र.क्र.१९/का-२, दिनांक ५ डिसेंबर, २००५.
४) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.मसके-२००५/प्र.क्र.२०२/का-२, दिनांक २१ जानेवारी, २००६.
५) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.मसके-२००६/प्र.क्र.२५६/का-२, दिनांक १७ ऑक्टोबर, २००६.
६) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२००९/प्र.क्र.३०६/का-२, दिनांक ३० जून, २०१०.
७) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१०/प्र.क्र.४२३ (भाग-२) /का-२, दिनांक २२ फेब्रुवारी, २०११.
८) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२००९/प्र.क्र.३०६/का-२, दिनांक १ मार्च, २०११.
९) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.समुप-२०१२/प्र.क्र.१९/का-१०, दिनांक २७ जून, २०१२.
१०) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.समुप-२०१३/प्र.क्र.५/का-१०, दिनांक ४ जानेवारी, २०१४.
११) महिला व बाल विकास विभाग, आदेश क्र. रिटपी-२०१३/प्र.क्र.२०७/का-१०, दिनांक ३० जुलै, २०१४.

## प्रस्तावना -

महिलांवर व बालकांवर होणाऱ्या अत्याचारांना प्रतिबंध करुन, त्यांना संरक्षण / मदत उपलब्ध करुन देण्याचे दृष्टीने केंद्र शासनाने प्रामुख्याने ज्या सूचना केलेल्या होत्या, त्या अनुषंगाने उपाययोजना करण्यासाठी अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखाली कृतिदलाची (TASK FORCE) स्थापना करण्यात आलेली होती. सदर कृतिदलाच्या बैठकीमध्ये झालेल्या विचार विनिमयानुसार टाटा सामाजिक विज्ञान संस्था, मुंबई या संस्थेकडून मुंबईतील तीन पोलीस ठाण्यांच्या आवारामध्ये सन १९९४ पासून चालविण्यात येणाऱ्या कौटुबिक हिंसाग्रस्त व पिडीत महिलांसाठीच्या समुपदेशन केंद्राच्या धर्तीवरच आणखी काही ठिकाणी महिला समुपदेशन केंद्रे चालविण्याची शिफारस कृतिदलाने केली होती. त्या अनुषंगाने संयुक्त राष्ट्र संघटनेच्या युनिफेम (Unifem - United Nations Development Fund for Women) या आंतरराष्ट्रीय संस्थेने तीन वर्षाच्या कालावधीकरीता उपलब्ध करुन दिलेल्या निधीतून राज्यातील वरील ३ समुपदेशन केंद्रासह एकूण १० ठिकाणी महिला समुपदेशन केंद्रे चालविण्यात येत होती. राज्य शासन, टाटा सामाजिक विज्ञान संस्था आणि युनिफेम यांच्यामध्ये झालेल्या सामंजस्य करारानुसार, कराराचा कालावधी संपल्यानंतर सदरील केंद्रांचा आढावा घेऊन उपयुक्त वाटल्यास राज्य शासनाने ती पुढील कालावधीकरीता चालवावीत. तसेच, भविष्यात निर्माण करावयाच्या इतर केंद्रांना देखील त्याच अटींवर मंजूरी देण्यात यावी, असा निर्णय संदर्भाधीन दि.१६.८.२००१ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे. सदर शासन निर्णयास अनुसरुन संदर्भ क्र.३ येथील दि.५.१२.२००५ च्या शासन निर्णयानुसार सदर महिला समुपदेशन केंद्रे राज्य शासनामार्फत चालविण्याचा निर्णय घेण्यात आला. त्या अनुषंगाने सध्या राज्य शासनामार्फत ३४ जिल्ह्यात ३९ महिला समुपदेशन केंद्रे कार्यरत आहेत.

मुंबई उच्च न्यायालयाने क्रिमिनल अपिल नंबर ३५९/२००८ मध्ये The Government of Maharashtra shall create more counseling centers (special cell) for women & children at the taluka level in a phased manner याप्रमाणे निर्देश दिलेले आहेत. त्यानुसार कार्यवाही करण्याच्या दृष्टीने सुरुवातीला ३५ जिल्ह्यांकरीता प्रत्येक जिल्ह्यात ३ याप्रमाणे १०५ समुपदेशन केंद्र स्थापन करण्याची बाब विचाराधीन होती. त्यानुसार संदर्भ क्र.९ येथील दि.२७ जून, २०१२ च्या शासन निर्णयानुसार ५१ समुपदेशन केंद्रांना, संदर्भ क्र.१० येथील दि.४ जानेवारी, २०१४ रोजीच्या शासन निर्णयान्वये ३५ समुपदेशन केंद्रांना व संदर्भ क्र.११ येथील दि.३० जुलै, २०१४ रोजीच्या शासन आदेशान्वये १ समुपदेशन केंद्रास अशा एकूण ८७ समुपदेशन केंद्रांना यापूर्वी मंजूरी देण्यात आली आहे. उर्वरीत १८ समुपदेशन केंद्रांना मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय-

वरील प्रस्तावनेत नमूद केल्याप्रमाणे उर्वरीत १८ समुपदेशन केंद्रांपैकी सोबतच्या **परिशिष्ट-ब** मध्ये नमुद १० समुपदेशन केंद्र यापुढे नमूद केलेल्या जिल्ह्यातील तालुक्यांच्या ठिकाणी पोलीस स्टेशनच्या आवारात सुरु करण्यास या शासन निर्णयाच्या दिनांकापासून मान्यता देण्यात येत आहे. सदर केंद्रांना आवश्यक जागा, फर्निचर, टेलिफोन, स्टेशनरी व इतर मुलभूत सुविधा संबंधित पोलीस स्टेशनने उपलब्ध करुन द्याव्यात. सदर

समुपदेशन केंद्राकरीता लागणाऱ्या खर्चाचा तपशिल वाचा क्र.१ व २ मधील शासन निर्णयात विहित केल्यानुसार राहील.

२. सदर समुपदेशन केंद्र तात्काळ कार्यान्वित करण्याबाबत कार्यवाही संबंधित जिल्ह्याचे पोलीस अधिक्षक व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांनी करावी व सदर समुपदेशन केंद्र कार्यान्वित झाल्याबाबत पोलीस अधिक्षक यांनी अहवाल आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांना सादर करावा.

आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांनी वेळोवेळी सदर समुपदेशन केंद्र कार्यान्वित झाल्याबाबत व त्यांच्या कामकाजाबाबत आढावा घ्यावा.

नवीन सुरु करण्यात येणाऱ्या १० महिला समुपदेशन केंद्रासाठी मार्गदर्शक तत्वे **परिशिष्ट-अ** मध्ये सोबत जोडली आहेत.

३. पोलीस स्टेशनच्या आवारात कार्यरत महिला समुपदेशन केंद्रातील समुपदेशक सामाजिक कार्य शाखेतील पदव्युत्तर पदवी अर्हताप्राप्त (MSW) असावेत. तसेच सदर समुपदेशकांचे मानधन संबंधित जिल्ह्याच्या जिल्हा महिला व बाल विकास अधिकाऱ्याने त्या समुपदेशकाच्या स्वत:च्या नांवे असलेल्या बँक खात्यात सरळ जमा करण्याबाबत दक्षता घ्यावी. म्हणजे मानधनाची रक्कम स्वयंसेवी संस्थेमार्फत देण्यात येवू नये. मात्र इतर अनुज्ञेय प्रशासकीय खर्च स्वयंसेवी संस्थेला देण्यात यावा.

सदर समुपदेशकाच्या प्रशिक्षणावर शासन खर्च करणार असल्यामुळे, त्यांना जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांच्या मान्यतेशिवाय काढून टाकता येणार नाही. तसेच समुपदेशकाने स्वेच्छेने काम सोडल्यास, त्याने संबंधित जिल्हा महिला व बाल विकास अधिकाऱ्यास कळविणे आवश्यक राहील.

संबंधित संस्थेने सदर समुपदेशन केंद्रावर खालीलप्रमाणे फलक दर्शनी भागात लावावा.

महिला समुपदेशन केंद्र,

(महिला व बाल विकास विभाग, महाराष्ट्र राज्य यांची मान्यता प्राप्त)

सदर फलकावर संस्थेचे नाव नसावे.

४. आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांना या योजनेसाठी नियंत्रक अधिकारी तसेच जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांना आहंरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. आयुक्तांनी सदरची रक्कम संबंधित जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांना वितरीत करावी व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांनी ती रक्कम कोषागारातून आहंरीत करुन संबंधित संस्थांना आवश्यकतेनुसार वितरीत करावी. संबंधित संस्थांनी प्राप्त झालेल्या अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र (Utilisation Certificate) तसेच इतर आवश्यक माहिती जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांना वेळोवेळी सादर करावी व त्यांनी आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांना सादर करावी व आयुक्तांनी त्यांचा अहवाल शासनास वेळोवेळी सादर करावा.

५. यावरील होणारा खर्च मागणी क्रमांक एक्स-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२, समाजकल्याण, १०३, महिला कल्याण, (२१) (०१) महिला समुपदेशन केंद्रे, (२२३५ ३१७ ७) ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर), या उपलेखाशिर्षामध्ये उपलब्ध असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा व तो त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१७२/१२/व्यय-सहा, दि.१७.३.२०१२ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१०१७१२२२१७९५३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vibhute Chandrakant A

Digitally signed by Vibhute Chandrakant A
DN: CN = Vibhute Chandrakant A, C = IN, S = Maharashtra, O = Government of India, OU = Women and child Department
Date: 2014.10.28 12:44:18 +05'30'

**चंद्रकांत विभूते**
कार्यासन अधिकारी

प्रत,

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.मंत्री (गृह), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.मंत्री / राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
८. अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. प्रधान सचिव, (व्यय) / (लेखा व कोषागारे), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
१३. आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे
१४. पोलीस महासंचालक, पोलीस मुख्यालय, मुंबई.
१५. विशेष पोलीस महानिरिक्षक (महिला अत्याचार प्रतिबंध कक्ष), पुणे.
१६. सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य महिला आयोग, बांद्रा, मुंबई.
१७. महाप्रबंधक, मा.उच्च न्यायालय, मुंबई.
१८. महाप्रबंधक, उपलोकायुक्त व लोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई.

१९. सर्व निबंधक, मा.उच्च न्यायालय, खंडपीठ, नागपूर / औरंगाबाद.
२०. सर्व जिल्हा न्यायाधीश, जिल्हा न्यायालय.
२१. सर्व जिल्हाधिकारी,
२२. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
२३. राज्य समन्वयक (PPMU), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२४. सर्व पोलीस आयुक्त / पोलीस अधिक्षक,
२५. महालेखापाल, महाराष्ट्र १ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परिक्षा), मुंबई.
२६. महालेखापाल, महाराष्ट्र २ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परिक्षा), नागपूर.
२७. उप आयुक्त (महिला विकास), महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२९. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
३०. सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी.
३१. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
३२. सर्व मंत्रालयीन विभाग.
३३. सर्व अधिकारी, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
३४. समन्वयक, महिला व बालकांचे विशेष कक्ष, टाटा सामाजिक विज्ञान संस्था, देवनार, मुंबई.
३५. परिशिष्ट-ब मधील सर्व स्वयंसेवी संस्था (आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांच्यामार्फत)
३६. सर्व महिला समुपदेशन केंद्र / सेवा पुरविणारे / सर्व आश्रयगृहे (आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांच्यामार्फत)
३७. निवड नस्ती/का-१०.

# Annexure A

## Guidelines for Operating Councelling Centres (Special Cell ) for Women and Children

The Special Cells for Women and Children is joint programme of the Dept. of WCD, Home - Police and the Civil Society Organisation/Women's Organisations, located within the Maharashtra police system to work on the issue of Violence against Women and Children. The Special Cell undertakes its work within the Indian Constitution, and work towards ensuring that women are recognised as individuals, with equal rights and opportunities in society, including the opportunity to live peaceful violence – free life.

The Special Cell is esp. located within the police system to work with a clear understanding that Violence against Women is a crime, against both her and society, and that it is the responsibility of the state to prevent, protect and counter it.

### Role and Responsibility of the Steering Committee:

- Police Development Decisions on Principles and Implementation.
- Advising on financial management of Special cell.
- Review the program plans/work plans of the organising and implementing agencies.
- Facilitate coordination with different arma of the Govt and stakeholders for the smooth and effective functioning of the Special Cells
- Periodic monitoring of implementation of the program through reporting from the three partners of the program/ coordinators of the Special Cells
- Develop and plan newer and contextual strategies to deal with Violence against Women.
- Develop a criterion to choose Organising agencies for establishing Special Cells.
- Develop a system for monitoring and eva;uation of the Special Cell an organising agencies.

### Role of Nodal Department (WCD)

- Be member of the steering committee to guide the work of special Cell
- Provide funding through organising agencies for Special Cell's managed them.
- Policy Support for effective interventions for implementing agencies.
- Monitoring o f the project through periodic visits and reports from implementing agency /Coordinators of the Special Cells.
- Implement evaluation and monitory system development by the Steering Committee.

### Role of DIG (PAW)

- Facilitate and coordinate ongoing day-to-day work of Special Cell to facilitate the setting up of social services within the police system.
- Monitor and supervise guide the Special Cells based on the objectives and Monitoring Indicators of the Special Cells

- Facilitate and coordinate capacity building of Special Cells on socio – legal work with violated women.
- DIG (PAW) will periodicall visit the district where the Cells are functioning to facilitate and monitor there functioning to discuss the same with the Co- ordinator and to give feedback to the steering committee.
- Be member of the steering committee to guide the work of Special Cell.

## Role of SP/Commissioner where Special Cell is located

- Support Policy implementation of the program at District level
- Monitoring the work of the Special Cells
- Support/initiate Special Cell District specific interventions on VAW

For the Special Cell to smoothly functioning of the Special Cell, within the police system administrative and infrastructural support is necessary from concerned police unit where Special Cell is located i.e.

- An independent room for Special Cell with some space as waiting area for clients.
- Postal help to reach call letters to clients. Wireless and control room access.
- Furniture- 2 Tables, 6 -8 Chairs, 1 Cupboard, 2 Benches.
- Stationary
- Parallel or independent telephone line.
- Providing a vehicle from M.T. Section as and when required for home visits.
- Providing and Identity card/Authority letter to the Social Workers attached to your unit. So that they can visit police station, access records, jails, look up without any difficulty.
- Make available/depute at least one police personnel to help/support the social worker for administration.

## Role of the Organising Agency –

- Implement the program based on the principles and objectives defined for Special Cells.
- Appoint suitable trained Social Workers for the intervention.
- Orient and train social workers for the work on Violence against Women.
- Day to day Supervision of the program.
- Facilitate co-ordination between different stakeholders of the program
- Facilitate on-going traning and capacity building of the worker
- Maintain documentation, reports and records of the work.
- Confidentiality of work with violated women must be maintained.
- Financial and admistrative decision making for smooth functioning of the Special Cells.
- Submit assessment reports to DWCD and the assessment report format approved by the Steering Committee.

## Role of the TISS-

- Share the resources build form experience, research and documentation of being an initial implementing agency –
- Facilitation and support planning and setting up of new Special Cells.
- Advice and Assist stakeholders of Special Cells on issues of Violence against Women.
- Training and capacity building of different stakeholders
- Participate in Policy Direction / Decisions for the Sp Cells.
- Jointly work on research and documentation with implementing agencies, and other stakeholders of Sp Cells.

## The Special Cell's approach to work on Violence against Women.

The Special Cell's priority of work is the violated women, and it is committed to work in the interests of violated woman as a marginalized and vulnerable group. The Special Cell works with all women, irrespective of caste, class, and ethnicity. The Special Cell recognizes the violated woman as a person with rights and entitlements, and enables her to gain access to these through the problem – solving process. The Special Cell believes that violated woman has innate strengths, as well as the potential capacity to make her own decisions, and determine the course of her own life. She is empowered through the problem – solving process, which validates her experiences . The Special Cell acknowledges with humility the violated woman's spirit to survive, and her struggles.

## The objectives of the Special Cells are defined as

1. Rebuilding violated women's self – esteem, self – worth and dignity.
2. Offer immediate services in cases of family violence and atrocities against women in the form of :
    a) Police assistance in registering criminal complaints and in an other matter.
    b) Placement in institutions.
    c) Counselling
    d) Referral to family service agencies and other services including medical, psychiatric, educational and vocational.
    e) Legal aid.
3. Be a liaison between police and organizations for women and children
4. Create awareness among women themselves, among professional groups and general public of the atrocities committed against women and children.

5. Document the work of the Special Cell and develop training material for social work students and police personnel.

The Special Cell's interventions related to the issue of violence against women draws from the framework of Social Work practice and the pro-women perspective. Further, the role of the Special Cell's social worker is central to the approach of work.

## Monitoring Indicators (Operating Procedures or Protocols )

The monitoring indicators have been developed under ten categories, with each category representing an area of work of the Special Cells. Each of these areas is further segmented into specific indicators representing social work interventions within a particular area of work. These indicators are to be used holistically and not individually, as each of them represents a part of the work done at the Special Cells. Monitoring Indicators were developed and finalized in the course of UNIFEM project and are detailed out in book 'Mission Statement and Monitoring Indicators for Special Cell for Women and Children' (2004)

A. Social work interventions for providing emotional support and strengthening the psychological self of the violated woman.
B. Social work interventions for negotiating for non-violence with various stakeholders.
C. Social work interventions for building support systems for violated women.
D. Social work interventions for engaging police help in the interest of violated women.
E. Legal Aid to facilitate the violated woman's journey through the criminal justice system.
F. Social work interventions related to arranging shelter for violated woman.
G. Social work interventions related to working with men in the interest of violated women.
H. Social work interventions related to the re-establishment of women's relationships with their economic assets.
I. Social work interventions for advocacy for group entitlement in the interest of violated women.
J. Social work interventions related to development counseling with violated women.

-----

## शासन निर्णय क्र.समुप-२०१३/प्र.क्र.५ (भाग-२)/का-१०, दि.१७ ऑक्टोबर, २०१४ चे परिशिष्ट

## परिशिष्ट-ब

| अ.क्र. | जिल्हयाचे नाव | तालुक्याचे नाव | समुपदेशन केंद्र मंजूर झालेल्या संस्थेचे नाव, पूर्ण पत्ता, नोंदणीकृत तालुका व जिल्हा |
|---|---|---|---|
| १ | लातूर | अहमदपूर | **राजर्षी शाहु बहुद्देशिय ग्रामीण विकास संस्था, काळेगाव,** ता.अहमदपूर जि.लातूर. |
| २ | | उदगीर | **सर्वांगीण विकास संस्था, उदगीर,** ता.उदगीर जि.लातूर. |
| ३ | अकोला | बाळापूर | **विदर्भ विकास महिला व बाल कल्याण शिक्षण संस्था, अकोला,** दिशा प्रशिक्षण केंद्र, खेडकर नगर, जवाहर नगर चौक, जि.अकोला. |
| ४ | | अकोट | **विदर्भ विकास बहुद्देशिय संस्था, प्रथमेश अपार्टमेंट, व्दारका नगरी, अकोला, ता.अकोला जि.अकोला.** |
| ५ | पुणे | शिरुर | **पंचशिल शिक्षण प्रसारक मंडळ,** ३०७८, मुंबई बाजार, शिरुर जि.पुणे. |
| ६ | | बारामती | **असोसिएशन फॉर रुरल जस्टीस ॲण्ड अर्बन अलायन्स (अर्जुन),** सत्यवती, मु.सावंतवाडी पो.उडवडी, क.प.ता. बारामती, जि.पुणे. |
| ७ | वाशिम | मालेगाव | **स्वामी विवेकानंद बहु. व स्वयंसेवी शिक्षण प्रसारक मंडळ, मैराळडोह,** ता.मालेगाव जि.वाशिम |
| ८ | नागपूर | काटोल | **प्रयास बहु. संस्था,** मु.पो.राउळगाव ता.काटोल, जि.नागपूर, व्दारा- सी-२, रचना विहार, बोरकुटे ले आऊट, नरेंद्र नगर, नागपूर. |
| ९ | | रामटेक | **आधार बहुद्देशिय संस्था,** ९९, आझाद हिंद नगर, जैताळा रोड, नागपूर. |
| १० | | उमरेड | **रुबी सोशल वेल्फेअर सोसायटी,** डॉ.जाफरी रिसर्च सेंटर, उमरेड रोड, मोठा ताजबाग, नागपूर. |

Vibhute Chandrakant A

Digitally signed by Vibhute Chandrakant A
DN: CN = Vibhute Chandrakant A, C = IN, S = Maharashtra, O = Government of India, OU = Women and child Department
Date: 2014.10.28 12:45:50 +05'30'

(चंद्रकांत विभूते)
**कार्यासन अधिकारी**